**सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी व जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी/ जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत.**

***महाराष्ट्र शासन***

*सामान्य प्रशासन विभाग*

शासन निर्णय, क्रमांकःमासैम-२०१०/(प्र.क्र.१६९/२०१०)/२८

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- **२०.०७.२०१०.**

**वाचा** :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम-१०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ०४.१०.२०००,

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैक-२००२/९३३/प्र.क्र.८६/२००२/२८, दिनांक ०९.१२.२००३,

३) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/सैकवि-१६/३३२२, दिनांक ०९.०६.२०१०,

४) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/सैकवि-१६/३४९२, दिनांक १४.०६.२०१०,

५) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०१९/अ/सैकवि-१६/३६२१ व ३६१९, दिनांक २८.०६.२०१०,

**शासन निर्णय** :-

संदर्भाधीन अ.क्र.(१) व (२) येथील शासन निर्णयाद्वारे जम्मू-काश्मिर मधील नियंत्रण रेषेजवळील क्षेत्रात तसेच देशातंर्गत भागात मे, १९९९ पासून निर्माण झालेल्या युध्दजन्य तणावाच्या परिस्थितीत/चकमकीत/मोहिमेअंतर्गत धारातीर्थी पडलेल्या सैन्यदलातील महाराष्ट्र राज्यातील सैनिकांच्या विधवांना/अवलंबितांना प्रत्येकी रुपये ५.०० लाख प्रमाणे एकवेळची आर्थिक मदत देण्याबाबत त्याचप्रमाणे गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व आलेल्यांना त्यांच्या अपंगत्वाच्या प्रमाणानुसार रु.१.०० व रु.३.०० लाख आर्थिक मदत देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र.(३) ते (५) येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावात अंतर्भूत खालील तक्त्यात नमूद केलेल्या युध्दजन्य परिस्थितीत/चकमकीत/मोहिमेअंतर्गत धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्र राज्यातील जवानांच्या अवलंबितांना तसेच गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेल्या जवानानां खाली दर्शविल्याप्रमाणे आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देत आहे.

अ) धारातीर्थी पडलेला जवान (रुपये ५ लाख प्रमाणे एक वेळची आर्थिक मदत) -

| अ. क्र. | नाव | मृत्यू दिनांक /मोहिम | वारसाचे नाव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | कै. अरुण लक्ष्मण पालेकर,<br>जेसी-५६९७०९डब्लू,<br>८ महार रेजिमेंट,<br>सुबेदार. | ०८.११.२००९<br>ऑपरेशन रक्षक<br>(जम्मू-काश्मिर) | १.श्रीमती सुस्मिता अरुण पालेकर (वीरपत्नी) - रु.३.०० लाख,<br>२.श्रीमती अनुसया लक्ष्मण पालेकर, (वीरमाता) - रु.२.०० लाख,<br>मु.पिरळे, पो.दहीगांव, ता.माळशिरस, जि.सोलापूर. |
| २ | कै. निलेश पोपट जाधव,<br>१५५७४१११एफ,<br>८ राष्ट्रीय रायफल बटालीयन<br>(१०६ इंजिनियर रेजीमेंट)<br>सॅपर | २०.०२.२०१०<br>ऑपरेशन रक्षक<br>(जम्मू-काश्मिर) | १.श्रीमती दमयंती निलेश जाधव (वीरपत्नी) - रु.३.०० लाख,<br>२.सौ.प्रमिला पोपट जाधव, (वीरमाता) - रु.१.०० लाख,<br>३.श्री.पोपट रघुनाथ जाधव (वीरपिता) - रु.१.०० लाख,<br>मु.पो.लोधवडे, ता.माण, जि.सातारा. |

ब) गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेले जवान -

| अ. क्र. | नाव व पत्ता | मोहिम, दिनांक व अपंगत्वाचे प्रमाण | दिनांक ४.१०.२००० च्या शासन निर्णयानुसार अनुज्ञेय रक्कम |
|---|---|---|---|
| १. | गनर (डी.एम.टी.) नुरोद्दीन अमिरोद्दीन शेख,<br>१५१४२०३९पी,<br>३४ मेडीयम रेजिमेंट (४९ राष्ट्रीय रायफल्स)<br>मु.पो.करंजखेड, ता.कन्नड, जि.औरंगाबाद | २२.१२.२००३<br>ऑपरेशन रक्षक<br>(जम्मू-काश्मिर)<br>१०० टक्के | रुपये ३.०० लाख |
| २. | कॉन्स्टेबल विवेक लक्ष्मण पाटे,<br>८९००९२७२५,<br>७८ बटालियन, सीमा सुरक्षा बल,<br>प्लॉट नं.२७, हेरंब हौसिंग सोसायटी,<br>राजीव नगर, नाशिक-९. | ०७.१०.२००७<br>कॉऊंटर इन्सरजेन्सी ऑपरेशन<br>(कोहिमा सेक्टर, नागालँड)<br>८५ टक्के | रुपये ३.०० लाख |

२. वरील परिच्छेद क्र.(१) मध्ये नमूद केलेल्या धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या अवलंबितांना तसेच गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेले जवानाना द्यावयाची आर्थिक मदत रु.१६,००,०००/- (रुपये सोळा लाख फक्त) इतक्या रक्कमेपैकी ४०% रक्कम रु.६,४०,०००/- (रुपये सहा लाख चाळीस हजार फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरीत ६०% रक्कम रु.९,६०,०००/- (रुपये नऊ लाख साळ हजार फक्त) मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रु.२२.२२ कोटी रक्कमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. उपरोक्त परिच्छेद क्र.(२) मधील प्रयोजनार्थ होणारा रु.६,४०,०००/- (रुपये सहा लाख चाळीस हजार फक्त) इतका खर्च मागणी क्र .ए-५ लेखाशीर्ष " २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण क ार्यक्रम, १०२-सामाजिक सुरक्षा योजने खाली निवृत्तीवेतन - (००)(०४) देशांतर्गत सुरक्षासंबंधी मोहिमेत/ चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सैन्यातील जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५-२६०-८) ५०-इतर खर्च" याखाली सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या अवलंबितांना तसेच गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेले जवानाना द्यावयाची आर्थिक मदत संबंधित जिल्हयांच्या पालक मंत्र्यांच्या हस्ते देण्यात यावी.

५. याबाबत संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संबधित पुरस्कारार्थ्यांना सदरहू रक्कम लाभार्थ्यांची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व तत्संबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम-१०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ०४.१०.२००० तसेच क्र.मासैक-२००२/९३३/प्र.क्र.८६/२००२/२८, दिनांक ०९.१२.२००३ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००७२०१४२३२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(अ. द. जोशी)
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (मासैक),
मा.राज्यमंत्री (मासैक),
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई, (शाखा -ड-५/ड-६) २० प्रती)
महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा व आज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर,
कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई - ४०० ००५,
जिल्हाधिकारी, सोलापूर, सातारा, औरंगाबाद, नाशिक,
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, सोलापूर, सातारा, औरंगाबाद, नाशिक,
संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे - ४११००६, (५ प्रती)
जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, सोलापूर, सातारा, औरंगाबाद, नाशिक,
सह संचालक, लेखा व कोषागार,संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,मुंबई - ३२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-४,) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
सामान्य प्रशासन विभाग/कार्या-२५,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती (२ प्रती).